**दि.१/११/२००५ पूर्वी नियुक्त व दि.१/११/२००५ नंतर १००% अनुदाना प्राप्त शाळेतील कर्मचाऱ्यांने दाखल केलल्या रिट याचिकेमध्ये शासनाच्या बाजूने अपील दाखल करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : न्यायाप्र २८१६/प्र.क्र. १३ /टिएनटी ६**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगूरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख:- ३१ जानेवारी, २०१७

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः अंनियो १००५/१२६/सेवा ४, दि.३१/१०/२००५**
२) **शासन निर्णय क्रमांकः अंनियो १००६/(२३/०६)/माशि २, दि.२९/११/२०१०**

**शासन परिपत्रक -**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये शासन सेवेत दि.१/११/२००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त होणाऱ्या सर्व शासकीय कर्मचाऱ्यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयाच्या धर्तीवर विभागाच्या दि.२९/११/२०१० च्या शासन निर्णयान्वये राज्यातील मान्यता प्राप्त व १००% शासन अनुदानित प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा /कनिष्ठ महाविद्यालयात दि.१ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा तद्नंतर नियुक्त होणाऱ्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना उक्त निवृत्तीवेतन योजना लागू करण्यात आली आहे.

२. शासनाच्या दि.१९ जुलै, २०११ च्या शासन निर्णयान्वये दिनांक १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी जे उमेदवार राज्यातील मान्यता प्राप्त १०० टक्के शासन अनुदानित प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा / कनिष्ठ महाविद्यालये / अध्यापक विद्यालये / सैनिकी शाळा/विद्यानिकेतने इ.मध्ये शिक्षण सेवक म्हणून करार पद्धतीने मानधनावर नियुक्त आहेत अशा शिक्षण सेवकांना ते त्यांची मानधनावरील सेवा समाधानकारकरित्या पूर्ण करुन नियमित वेतनश्रेणीत आल्याच्या दिनांकापासून त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू केली आहे.

३. तथापि, दि.१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी नियुक्त परंतु दि.१ नोव्हेंबर, २००५ नंतर १००% अनुदान प्राप्त झालेल्या शाळेतील कर्मचाऱ्यांना जूनी पेंशन योजना लागू करणेसंदर्भात मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद व नागपूर येथे अनेक याचिका दाखल करण्यात आल्या आहेत. अशा सर्व याचिकांमध्ये मा.उच्च न्यायालयाने सर्वसाधारणपणे खालीलप्रमाणे आदेश दिले आहेत :-

The petitioners states that the petitioners have been appointed prior to 1st November, 2005 as Assistant Teachers and the schools in which they were appointed were 100% aided schools prior to 1st November, 2005. We accept the said statement. If the said statement is correct, the petitioners will be governed by the Rules and Regulations relating to pension and other retirement benefits which were applicable as on 31.10.2005 and the new Defined Contribution Pension Scheme will not be applicable to them.

४. परंतु नागपूर खंडपीठ येथे दाखल याचिका क्र.६७५/२०१४ मध्ये दि.२७ जानेवारी, २०१४ रोजी दिलेल्या निर्णयात न्यायालयाने होमराज हंसराज बिसेन ( रिट याचिका क्र.३४५८/२०१२ ) या याचिकेतील दि.२० नोव्हेंबर, २०१२ च्या न्यायालयीन निर्णयातील परि.क्र.१५ व १६ चा आधार घेऊन शासनाच्या बाजूने निर्णय दिला आहे.

५. मा.न्यायालयाचे उपरोक्त प्रमाणे आदेश असताना शासनाने याचिका क्र.६७५/२०१४ मधील दि.२७ जानेवारी, २०१४चा न्यायालयीन निर्णय विचारात घेऊन रिट याचिका क्र.२६२६/२०१४ मध्ये वित्त विभागाच्या मान्यतेने शासनाच्या वतीने शपथपत्र दाखल करण्यात आले आहे. तरी, यापुढे शासनाच्या विरोधात असलेल्या निर्णयात शासनाच्या वतीने शपथपत्र दाखल करताना होमराज हंसराज बिसेन ( रिट याचिका क्र.३४५८/२०१२) या याचिकेतील पुढील मुद्यांचा उल्लेख शपथपत्रात करण्यात यावा.

अ. परि.क्र.१५ :- The state Government has in unequivocal terms stated that it has been policy of the State to make applicable pensionary scheme only to such of the employees who were working in hundred percent aided schools. Notice is also required to be taken that only after school starts receiving hundred percent grant-in-aid entire salary amount of the employees would be required to be paid by the Government. Till the School is made entitled to receive 100% grant-in-aid, the State Government is not enjoined with the responsibility of paying entire salary. It is also a settled principle of law that primary responsibility to make payment of salary to the staff is on the Management. In that view of the matter, we find that decision in prescribing the cut-off date of dt. 1.11.2005 and providing that only such of the employees who are working on 100% aided schools prior to dated 1.11.2005 being entitled to the benefit of Old scheme cannot be said to be either unreasonable or arbitrary. It is only after the school is brought on hundred percent grant-in-aid basis, the employee of such school would be entitled to be equated with Government employee,

आ. परि.क्र. 16 :- We find that had the Government not prescribed such a cutoff date, it would have led to anomalous situation. As already discussed hereinabove, the basic responsibility in an unaided recognized school to pay salary to its employees is on the management of the school. Taking the hypothetical situation as suggested by the counsel for petitioners, if an

employee is appointed in 1998 and school comes to 100% grant in 2008 the question would be who would pay employer's contribution for a period of ten years. We, therefore, find that scheme as formulated by the State Government is also totally workable inasmuch as employee who is receiving 100% salary from the public exchequer prior to 1.11.2005 is being governed by old Scheme. Had such a cutoff date not being provided for, there would have been discrimination between employees of the State Government who are appointed on or after 1.11.2005 and who are getting 100% salary from the State Government and the employees who are not getting full salary from the State Government. The scheme has also taken care to see to it that a person who, though appointed in a school prior to 2005 and the school received 100% grant-in-aid after 2005, would be entitled to enter into the new scheme as on the date on which the school comes to 100% grant-in-aid.

इ. औरंगाबाद खंडपीठ येथील याचिका क्र.२६२६/२०१४ मध्ये दाखल करण्यात आलेले शपथपत्र व औरंगाबाद खंडपीठ याचिका क्र.६७५/२०१४ व नागपूर खंडपीठ येथील याचिका क्र.३४५८/२०१२ मधील न्ययालयीन निर्णयातील नमूद उपरोक्त बाबी लक्षात घेऊन शासनाच्या वतीने वरिष्ठ न्यायालयात शपथपत्र दाखल करण्यात यावे.

६. धोरणात्मक निर्णयाशी संबंधित न्यायालयीन प्रकरणांमध्ये शासनाच्यावतीने शपथपत्र दाखल करताना पुढील गोष्टींची दक्षता घेण्यात यावी.

- धोरणात्मक निर्णयाशी बाबी संबंधात शासनाच्यावतीने शपथपत्र दाखल करताना, संबंधित अधिकाऱ्यांनी शपथपत्रास प्रथम शासनाची मान्यता घेणे आवश्यक आहे.
- शासनाच्या वतीने न्यायालयात अपील / शपथपत्र विहित मुदतीत दाखल करण्याबाबत व अवमान याचिका दाखल होणार नाही, याबाबतची दक्षता घेण्यात यावी.
- सदर सूचनांचे काटेकोरपणे पालन करणेबाबत व विभागीय उपसंचालकांच्या स्तरावरुन शपथपत्र शासन मान्यतेस्तव सादर करण्याबाबतच्या सूचना या परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत.
- शासन निर्णय दि.१९ जुलै, २०११ अन्वये कर्मचाऱ्यांची नियुक्ती दि.१ नोव्हेंबर, २००५ पूर्वीची असणे व शाळा १००% अनुदानित असणे या दोनही अटींची पूर्तता होणे आवश्यक आहे. असे असतानाही अनेक प्रकरणी शाळा १००% अनुदानित नसताना केवळ नियुक्ती दि.१ नोव्हेंबर, २००५ पूर्वीची असल्यास अटीची पूर्तता होते असे धरुन जूनी पेंशन योजना लागू करणेबाबत मा.न्यायालयाने अंतरिम आदेश दिले आहेत अथवा जैसे थे आदेश दिले आहेत, अशा न्यायालयीन प्रकरणी तात्काळ सिव्हील ॲप्लीकेशन ( Civil Application) दाखल करुन, अंतरिम आदेश रद्द (vacate) करुन घेणेसंदर्भात कार्यवाही करणेबाबत संबंधितांना कळवावे.
- या सूचनांचे पालन न झाल्यामुळे शासनास आर्थिक भार सोसावा लागल्यास याबाबत जबाबदारी निश्चित करुन शिस्तभंग विषयक कारवाई सुरु करण्यात येईल याची नोंद घ्यावी.

७. शालेय शिक्षण विभागातील न्यायालयीन प्रकरणासंदर्भात धोरणात्मक निर्णयाशी संबंधित असलेल्या प्रकरणामध्ये उपरोक्त परि.६ मधील तरतुदी लागू राहतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०१३११२४७०६५६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2017.01.31 12:51:26 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. शिक्षण संचालक ( प्राथमिक / माध्य. व उच्च माध्यमिक ), शिक्षण संचालनालय, पुणे,
२. सर्व उप सचिव / अवर सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
३. सर्व विभागीय उपसंचालक,
४. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्य व उच्च माध्यमिक) जिल्हा परिषद.